जिल्हा परिषद व पंचायत समितींच्या सन १९६१ पर्यंतच्या व PRB मध्ये नोंद असलेल्या प्रशासकीय व निवासी इमारतींच्या देखभाल दुरुस्तीकरीता सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी निधी वितरीत करण्याबाबत...

लेखाशीर्ष-२०५९ ४५३१ (योजनांतर्गत)

## महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः योजना-२०२०/प्र.क्र.६९/बांधकाम-४
५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
दिनांक: २७ मार्च, २०२०

**वाचा :-**

१) **शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः** अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थसंकल्प-३, दिनांक ०१ एप्रिल, २०१९.

२) **शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः** अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थसंकल्प-३, दिनांक ०८ जुलै, २०१९.

३) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.** योजना-२०१९/प्र.क्र.८४/बांधकाम-४, दिनांक १४ ऑगस्ट, २०१९.

४) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.** जिपई-२०१९/प्र.क्र.१४६/बांधकाम-४, दिनांक २२ जानेवारी, २०२०.

**शासन निर्णय :**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता संपूर्ण अर्थसंकल्पास मंजूरी मिळाली असुन जिल्हा परिषद व पंचायत समित्यांच्या इमारतींच्या देखभाल दुरूस्तीसाठी एकूण रू.२०००.०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पीत झालेली असून, मजूंर तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत २०५९ ४५३१ या लेखाशीर्षांतर्गत खर्च भागविण्याकरीता, वित्त विभागाने रू.१२००.०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिली आहे. उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक ३ येथील दिनांक १४ ऑगस्ट, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये, सदर तरतूदीपैकी रू.१०००.०० लक्ष इतका निधी व अनुक्रमांक ४ येथील दिनांक २२ जानेवारी, २०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये रू.१००.०० लक्ष इतका असे एकुण रू.११००.०० लक्ष इतका निधी संबंधित जिल्हा परिषदांना वितरीत करण्यात आलेला आहे.

०२. वित्त विभागाच्या संदर्भीय दिनांक ०१.०४.२०१९ व दिनांक ०८.०७.२०१९ च्या परिपत्रकात नमुद केल्यानुसार, प्रशासकीय विभागांना दिलेल्या निधी वितरणाच्या अधिकाराच्या विहित मर्यादेच्या अधीन राहून, जिल्हा परिषद व पंचायत समितींच्या सन १९६१ पर्यंतच्या व PRB मध्ये नोंद असलेल्या प्रशासकीय व निवासी इमारतींच्या देखभाल दुरूस्तीकरिता, एकूण रक्कम रूपये १,००,००,०००/-(अक्षरी रू.एक कोटी फक्त) इतके सहायक अनुदान माहे मार्च, २०२० च्या कॅश फ्लो मध्ये मंजूर करुन, खालीलप्रमाणे जिल्हा परिषदेच्या संबंधीत मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अधिनस्त ठेवण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

०३. यापुर्वी सार्वजनिक बांधकाम विभागाकडून कामे मंजूरीबाबत जी कार्यपध्दती अवलंबिण्यात येत होती, तीच कार्यपध्दती अवलंबून कामे मंजूर करण्यात यावीत. इमारती देखभाल दुरूस्ती संदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाने विहीत केलेले नियम व मार्गदर्शक सूचनांचे पालन करून कामे करण्यात यावीत. तसेच दुरूस्ती पुर्वीचे व दुरूस्ती नंतरचे फोटो जतन करून ठेवण्यात यावेत.

०४. मंजूर कामाचे तुकडे न पाडता आवश्यकतेनुसार ई-निविदा कार्यपध्दतीचा अवलंब करून कामाचे आदेश देणे आवश्यक राहील.

**-: निधी वितरणाचे विवरणपत्र :-**

(रू.लाखांत)

| लेखाशीर्ष २०५९ ४५३१ खाली जिल्हा परिषद व पंचायत समितींच्या इमारतींच्या दुरुस्तीसाठी वितरीत करण्यात आलेला निधी | | |
|---|---|---|
| अ.क्र. | जिल्ह्याचे नाव | वितरीत करण्यात आलेला निधी |
| १ | २ | ३ |
| १ | औरंगाबाद | ५०.०० |
| २ | अहमदनगर | २५.०० |
| ३ | हिंगोली | २५.०० |
| **एकूण** | | **१००.००** |

०५. या कामांकरीता होणारा खर्च मागणी क्र. एल-३ "२०५९, सार्वजनिक बांधकामे, ८०-सर्वसाधारण, १९६ जिल्हा परिषदा/जिल्हा स्तरीय पंचायत समितींना सहाय्य (०१) स्थानिक (स्तर) क्षेत्रातील योजना, (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १८२ अन्वये इमारतींच्या दुरुस्तीसाठी जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदान, २७ लहान बांधकामे, (२०५९ ४५३१) (योजनांतर्गत)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठीसाठी करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

०६. वरीलप्रमाणे ज्या कामाच्या प्रयोजनार्थ निधी उपलब्ध करून दिलेला आहे, तो त्याच कामावर तात्काळ खर्च करुन, सदर सहाय्यक अनुदानाच्या विनियोजनासंबंधीचे उपयोगिता

प्रमाणपत्रे, महालेखापाल, संबंधीत विभागीय आयुक्त यांना पाठवून त्याची प्रत या विभागाकडे आठ दिवसांत पाठविण्याची जबाबदारी संबधित मुख्य वित्त व लेखा अधिकारी, जिल्हा परिषद यांची राहील. तसेच सदर अनुदानाच्या विनियोजना संबधी महालेखापाल कार्यालयास पाठविण्यात आलेल्या उपयोगिता प्रमाणपत्राची प्रत तसेच, संबंधित जिल्हा परिषदेने कोण-कोणत्या कामावर निधी खर्च केला याचा तपशील शासनास विहीत मुदतीत पाठविण्यात न आल्यास पुढील सहायक अनुदान वितरीत केले जाणार नाही, याची कृपया नोंद घ्यावी.

**०७.** प्रस्तुतचा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक, क्रमांक अर्थसं-२०१९/ प्र.क्र.४४/अर्थसंकल्प-३, दि.०१.०४.२०१९ व अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थसंकल्प-३, दिनांक ०८.०७.२०१९ मधील अटी-शर्तीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२७११०९५८९१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

RAJENDRA
NATHA
SAVANE

Digitally signed by RAJENDRA NATHA SAVANE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303,
postalCode=400032, street=MANTRALAYA , MUMBAI,
serialNumber=f049989dbbef93340e9edd88af960a0963746d42baa5c948405b62e821529a99,
ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
cn=RAJENDRA NATHA SAVANE
Date: 2020.03.27 12:27:12 +05'30'

**(रा. ना. सवने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद.
२. मा.मंत्री (ग्रा.वि.), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अतिरिक्त मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव (बांधकामे) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई- ३२.
७. विभागीय आयुक्त, विभागीय कार्यालय, औरंगाबाद व नाशिक.
८. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा, महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद, अहमदनगर व हिंगोली.

१०. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सर्व.
११. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद, अहमदनगर व हिंगोली.
१२. कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, औरंगाबाद, अहमदनगर व हिंगोली.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा औरंगाबाद, अहमदनगर व हिंगोली.
१४. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद, अहमदनगर व हिंगोली.
१५. उपमुख्य लेखा परिक्षक, जिल्हा, औरंगाबाद, अहमदनगर व हिंगोली.
१६. वित्त विभाग (व्यय- १५ , अर्थ-३) मंत्रालय, मुंबई-३२.
१७. कार्यासन अधिकारी, वित्त-१ व वित्त-७, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवडनस्ती कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.